**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेमार्फ़त अंमलबजावणी करण्यात येणा-या नळ पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.७३/पापु-१९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १८ मे, २०१७

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११५/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६
४) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण भागांतील दीर्घकालीन गरजांचा व आरोग्याचा विचार करुन ग्रामीण जनतेस पुरेसे व शुध्द पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याकरिता संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात सन २०१६-१७ ते सन २०१९-२० या कालावधीत “मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम” राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणा-या नळ पाणीपुरवठा योजनांचे संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१५ जून, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेमार्फ़त अंमलबजावणी करण्यात येणा-या सर्व नळ पाणी पुरवठा योजनांच्या कामांची गुणवत्ता तपासणी तसेच त्रयस्थ तांत्रिक परीक्षण महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या गुणवत्ता नियंत्रण कक्षाकडून करुन घेण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेमार्फ़त अंमलबजावणी करण्यात येणा-या सर्व नळ पाणी पुरवठा योजनांच्या कामांची गुणवत्ता तपासणी तसेच त्रयस्थ तांत्रिक परीक्षण महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या गुणवत्ता नियंत्रण कक्षाकडून करुन घेण्यात यावे. सदर त्रयस्थ तांत्रिक

परीक्षणाकरिता योजनेच्या ढोबळ किंमतीच्या १ टक्के किंवा रु.१० लाख यापैकी जे कमी असेल ते शुल्क म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास अदा करण्यात यावे. नळ पाणीपुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाबाबतची कार्यपध्दती व इतर सर्व बाबी संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१५ जून, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणेच राहतील.

२. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फ़त अंमलबजावणी करण्यात येणा-या सर्व नळ पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाबाबतची कार्यवाही संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१५ जून, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद-४ (१ ) मध्ये नमुद केलेल्या संस्थाकडून ( महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचा गुणवत्ता नियंत्रण कक्ष वगळून ) करुन घेण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१७१८१६४०९५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a016826b42bfd50da9289adab7343d06945234ea788393fe61e0e12977ee7728, cn=Ram Apparao Sabane
Date: 2017.05.18 14:57:22 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
७) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र २, नागपूर
९) मुख्य /अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद (सर्व).
१२) निवड नस्ती (पापु-१९)